सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने - यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, यशदा, पुणे यांना देण्यात यावयाच्या सहायक अनुदानाचे वाटप.
मागणी क्रमांक-एल(३)मुख्य लोखाशिर्ष-२४१५०५१७.
(पहिला हप्ता) (माहे एप्रिल ते मे, २०१७)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमाक :- अनुग्रा-२०१७/प्र.क्र.१२५/योजना-४
बांधकाम भवन, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१
दिनांक- १५ मे, २०१७.

प्रस्तावना-

पंचायत राज संस्थांमधील नवनिर्वाचित लोकप्रतिनिधी/पदाधिकारी/अधिकारी आणि ग्रामसेवक यांच्या क्षमता बांधणीकरिता प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यात येतात. राज्यात ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, ९ ग्राम सेवक प्रशिक्षण केंद्र व १ संयुक्त प्रशिक्षण केंद्र असून या केंद्रांच्या प्रशिक्षणाचे नियोजन, नियंत्रण करण्याकरिता यशदा, पुणे या संस्थेची नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आली आहे. "यशदा", पुणे यांचेमार्फत विविध प्रकारचे प्रशिक्षण कार्यक्रम राबविले जातात.

यशदा, पुणे या संस्थेस सन २००५-०६ पर्यन्त शासनाच्या सामान्य प्रशासन विभाग व ग्राम विकास विभागामार्फत योजनेतर सहायक अनुदान संयुक्तपणे दिले जात होते. सन २००६ ते २००९ पर्यन्त यशदा, पुणे यांना सामान्य प्रशासन विभागामार्फत एकत्रितरित्या योजनांतर्गत व योजनेतर सहायक अनुदान दिले जात होते. तद्नंतर सन २००९-१० मध्ये ग्राम विकास व जलसंधारण विभागास यशदा, पुणे यांचेसाठी २४१५ ०५१७ या लेखाशिर्षांतर्गत अर्थसंकल्पीय तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली. मात्र यशदा संस्थेच्या Board of Governer यांच्या बैठकीमध्ये ग्राम विकास विभागामार्फत अर्थसंकल्पित केलेली तरतूद वित्त विभागास समर्पित करावी आणि सामान्य प्रशासन विभागाने सदर निधी यशदा संस्थेस उपलब्ध करुन द्यावा असा निर्णय घेण्यात आला त्यास अनुसरुन या विभागास उपलब्ध झालेला उपलब्ध निधी वित्त विभागास समर्पित करण्यात आला. तद्नंतर सन २०१०-११ व २०११-१२ या आर्थिक वर्षामध्ये या विभागामार्फत यशदा संस्थेस सहायक अनुदाने देण्याकरिता अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आली नाही.

सन २०१२-१३ या आर्थिक वर्षापासून पुनश्च सामान्य प्रशासन विभाग व ग्राम विकास व जलसंधारण विभागामार्फत ५०:५० प्रमाणात यशदा, पुणे या संस्थेस सहायक अनुदान उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**-

सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. एल ३ -२४१५ कृषिविषयक संशोधन व शिक्षण-(०३) शासकीय संस्थांना सहायक अनुदाने (०३) (०१) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा),पुणे यांस सहायक अनुदाने २४१५ ०५१७" याखाली यशदा, पुणे या संस्थेकरिता रु.४५०.०० लक्ष (रु.चारशे पन्नास लक्ष) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर लेखाशिर्षांतर्गत सन २०१७-१८ मध्ये यशदा, पुणे या संस्थेकरिता माहे एप्रिल ते मे,२०१७ साठी रुपये ७५.०० लक्ष (रु.पंच्याहत्तर लक्ष) इतका अनुदानाचा पहिला हप्ता म्हणून विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे.

२. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा),पुणे या संस्थेस अनुदान वितरित करण्यासाठी विभागीय आयुक्त कार्यालयातील विकास शाखेचे उपायुक्त (आस्था), पुणे हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

४. संस्थेने आर्थिक वर्ष २०१७-१८ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

५. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा), पुणे या संस्थेने या अनुदानातून केलेल्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे, महालेखापाल, लेखापरिक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई व शासनास सादर करण्यात यावे.

६. या अनुदानातून संस्थेने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना रहातील आणि महालेखापाल यांना त्यांचे हे काम योग्यत-हेने पार पाडता यावे म्हणून सदर संस्था संपूर्ण मदत/सुविधा उपलब्ध करुन देईल.

७. उपरोक्त खर्च मागणी एल ३ -२४१५ कृषिविषयक संशोधन व शिक्षण-(०३) शासकीय संस्थांना सहायक अनुदाने (०३) (०१) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, (यशदा),पुणे यांस सहायक अनुदाने ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) ३६ सहायक अनुदान (वेतन) "२४१५ ०५१७" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१७-१८ या वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच उप लेखाशिर्षांतर्गत पडतो आहे, याबाबतचा ताळमेळ घेवून त्याचा अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

८. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार शासन निर्णय दिनांक १५/५/२००९ सोबतच्या उप विभाग - ३ मधील अ.क्र. १ परि. १६२, १६३, १६४ नुसार प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८ एप्रिल,२०१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१५१३३५४९९२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Mahadev Gengaje

Digitally signed by Rajendra Mahadev Gengaje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aadac6f62a04dc76f59a0a873d1263c7d14f6ea5080bb750bf392303a1a35907, cn=Rajendra Mahadev Gengaje
Date: 2017.05.15 16:01:29 +05'30'

( रा. म. गेंगजे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता) मुंबई,
२. महालेखापाल,महाराष्ट्र-१(लेखापरिक्षा) मुंबई,
३. आयुक्त, पुणे विभाग, पुणे(३ प्रती),
४. उप आयुक्त(आस्था) विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालय, पुणे,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
६. वित्त विभाग, व्यय-१५/अर्थ-१७,
७. नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-४०००३२,
८. उप सचिव(कार्यासन-१२-अ),सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई-४०००३२,
९. उप महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड÷,(यशदा), पुणे - ४११ ००७ (३ जादा प्रतीसह),
१०.कक्ष अधिकारी (कार्यासन वित्त-१/वित्त-७/वित्त-८/योजना-७) ग्राम विकास व जलसंधारण विभाग, बांधकाम भवन, गोदरेज शोरुमजवळ, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४००००१.